मा.सर्वोच्च न्यायालय येथील विशेष अनुमती याचिका (गुन्हे) क्रमांक ७०४/२०१६ मध्ये काम पाहिल्याबददल ॲड. संदिप शिंदे, शासकीय अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक : एमआयएस-०७१६/प्र.क्र.२२६/पोल-८**
गृह विभाग, दुसरा मजला, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०८ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ :** १) विधी व न्याय विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०८/ /Crim Gen/Confl/A, दि. २०.१०.२०१६
२) विधी व न्याय विभाग, शासन निर्णय क्रमांक मिटींग-२०११//२४९/डी-१४, दिनांक १५.०२.२०१४
३) विधी व न्याय विभाग, शासन निर्णय (शुध्दीपत्रक) क्रमांक मिटींग-२०११//२४९/डी-१४, दिनांक ०५.०९.२०१४

**शासन निर्णय** :

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल गुन्हे अपील क्र. ५७२/२०१५ प्रकरणी (सलमान खान विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या आदेशाविरुध्द मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुमती याचिका (फौजदारी) क्र. ७०४/२०१६ प्रकरणी काम पाहण्यासाठी असलेल्या ॲड.मुकुल रोहतगी, महा न्यायप्रतिनिधी, भारत सरकार यसांची नियुक्ती विधी व न्याय विभागाने त्यांचे दिनांक ३१.१२.२०१५ च्या पत्रान्वये केली आहे. तसेच महान्यायप्रतिनिधी ॲड. रोहतगी यांना सहाय्य करण्यासाठी ॲड. संदिप शिंदे, शासकीय अभियोक्ता यांची विधी व न्याय विभागाने त्यांच्या दिनांक ११.०२.२०१६ च्या पत्रान्वये नियुक्ती केलेली आहे. महाराष्ट्र विधी अधिकारी (नियुक्ती, सेवेच्या अटी व वेतन) नियम, १९८४ ला अनुसरुन विधी व न्याय विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ व ३ अन्वये सर्वोच्च न्यायालयातील प्रकरणामध्ये महाराष्ट्र शासनाच्या वतीने काम पाहिल्याबददल अदा करावयाच्या शुल्क व भत्त्यांचा तपशिल दिलेला आहे.

ॲड. संदिप शिंदे, शासकीय अभियोक्ता यांना सदर प्रकरणी सहयोगी महाधिवक्ता यांना देय असलेल्या दराने व्यावसायिक शुल्क मंजूर करण्याचे विधि व न्याय विभागाने अभिप्राय दिलेले आहेत. त्यानुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल असलेल्या विशेष अनुमती याचिका (फौजदारी) क्रमांक ७०४/२०१६ या प्रकरणामध्ये ॲड.संदिप शिंदे यांना प्रतिदिन रु.२५,०००/- (रु.पंचवीस हजार फक्त) यानुसार दिनांक ०५.०२.२०१६ व दिनांक १९.०२.२०१६ रोजीच्या एकुण दोन सुनावणींचे एकुण रु. ५०,०००/-, महा न्यायप्रतिनिधी, भारत सरकार यांच्या निर्देशावरुन न्यायालयीन कामकाजाशी संबंधीत प्रारुप तयार करण्यासाठी रु. २०,०००/- तर मुंबई-दिल्ली-मुंबई या प्रवासखर्चाचे रु. १०,३०७/- असे एकूण रु. ८०,३०७/- (रु. ऐंशी हजार तिनशे सात फक्त) अदा

करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. याव्यतिरिक्त, ॲड.संदिप शिंदे यांना अपरिणामकारक शुल्क वा इतर कोणतेही शुल्क वा भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षकीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

२. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक-बी-१, मुख्य लेखाशिर्ष "२०५५-पोलीस" "१०८ राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस (०१) (०१) शहर पोलीस आस्थापना (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून, तो सन २०१६-१७ या चालू वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर प्रकरणात पोलीस आयुक्त कार्यालय, बृहन्मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पाहिला, उपविभाग - दोन मध्ये नव्याने समावेश केलेल्या अ.क्र.४९, नियम क्र. १६६-अ अन्वये मिळालेल्या अधिकारानुसार तसेच विधी व न्याय विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १०८/ /Crim Gen/Confl/A, दिनांक २०.१०.२०१६ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११०९१५१४०१६९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tanaji Shrirang Bhosale

Digitally signed by Tanaji Shrirang Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Tanaji Shrirang Bhosale
Date: 2016.11.09 15:18:08 +05'30'

**( ता. श्री. भोसले )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रति :**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) ॲड.संदिप शिंदे, सरकारी अभियोक्ता, मुंबई उच्च न्यायालय
६) ॲड.एन आर. कटनेश्वरकर, सरकारी वकील. मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली
७) उप सचिव, विधी व न्याय विभाग (ई-शाखा), मंत्रालय, मुंबई.
८) उप सचिव, (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव, आस्था-२ / रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती (पोल-८).